मराठी भाषेसंदर्भात प्रमाणलेखन, वर्णमाला इत्यादी बाबींवर पुनर्विचार करण्यासाठी “मराठी प्रमाण लेखन निश्चितीकरण समिती” स्थापन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

### शासन निर्णय क्रमांक-कपासू-२०२०/प्र.क्र.५६/भाषा-२

नवीन प्रशासकीय इमारत, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई:-४०० ०३२.
दिनांक: १५ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. मभावा-२००४/प्र.क्र.२५/२००४/२०-ब, दि. ०६.११.२००९

२) मराठी भाषा विभाग, समक्रमांकित शासन निर्णय दि. २९.०९.२०२१

**प्रस्तावना :-**

संदर्भ (२) येथील शासन निर्णयान्वये मराठी भाषेसंदर्भात प्रमाणलेखन, वर्णमाला इत्यादी बाबींवर पुनर्विचार करण्यासाठी “मराठी प्रमाणलेखन निश्चितीकरण समिती” स्थापन करण्यात आली आहे. या समितीच्या दि. १८.११.२०२१ रोजीच्या प्रथम बैठकीत “देवनागरी लिपिच्या अभ्यासाला व संशोधनाला चालना देण्यासाठी उपाययोजना सुचविणे आणि संदर्भ (१) येथील शासन निर्णयात सुधारणा करण्याच्या अनुषंगाने लिपि तज्ज्ञ आणि संगणक तज्ज्ञ व्यक्तींचा मराठी प्रमाणलेखन निश्चितीकरण समिती मध्ये समावेश असणे” या मुद्दयांच्या संदर्भात चर्चा झाली. या चर्चेच्या अनुषंगाने “मराठी प्रमाणलेखन निश्चितीकरण समिती” च्या अध्यक्ष महोदयांनी श्री. गिरीश दळवी, लिपितज्ज्ञ आणि संगणक तज्ज्ञ यांचा समितीमध्ये “सदस्य” म्हणून समावेश करण्याबाबत शिफारस केली.

**शासन निर्णय:-**

“मराठी प्रमाणलेखन निश्चितीकरण समिती” च्या दि. १८.११.२०२१ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार, समक्रमांकित दि. २९.०९.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या “मराठी प्रमाणलेखन निश्चितीकरण समिती” मध्ये विद्यमान सदस्यांमध्ये पुढील सदस्याचा समावेश करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सदस्याचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. गिरीश दळवी, लिपि तज्ज्ञ आणि संगणक तज्ज्ञ | सदस्य |

श्री गिरीश दळवी, लिपि तज्ज्ञ आणि संगणक तज्ज्ञ यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११११५१४४५५८१६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND BHAGWAN GAWADE

Digitally signed by MILIND BHAGWAN GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d043e1f55c6ded344ffebea8801d8c286bfdcafaea54c716c9b31b47b87a9476, pseudonym=3FD721BE2B19DF245E0157FD3DC7B26475009465, serialNumber=EF777B84EAC7F675E3493144EF06F0FA1CB47DE2A32BE1156CA04D038F42D6E1, cn=MILIND BHAGWAN GAWADE
Date: 2021.11.15 14:50:03 +05'30'

**( मिलिंद गवादे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई.
३) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई.
४) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५) मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग.
६) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल,महाराष्ट्र-२ ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) सर्व विद्यमान समिती सदस्य
१०) श्री.गिरीश दळवी, लिपि तज्ज्ञ आणि संगणक तज्ज्ञ
११) भाषा संचालक,भाषा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
१२) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई
१३) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, प्रभादेवी, मुंबई
१४) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, धोबीतलाव, मुंबई
१५) सर्व कार्यासने,मराठी भाषा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६) कार्यासन भाषा-२- संग्रहार्थ.